एकात्मिक बाल विकास सेवायोजना हया केंद्रपुरस्कृत योजनेतंर्गत प्रशिक्षण संस्थासाठी अर्थसंकल्पित केलेला निधी खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१८/प्र.क्र.२५२/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०७ जानेवारी, २०१९

**वाचा :-** (१) केंद्र शासन,महिला व बाल विकास मंत्रालय यांचे पत्र क्र. ११/३०//२०१६-ICDS Training, दिनांक १२ डिसेंबर २०१८
(२) सहाय्यक आयुक्त (प्रशिक्षण) एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई यांचे पत्र क्रमांक :- एबाविसेयो/का-५/प्रशिक्षण/५०७४/२०१८,दिनांक २९/१२/२०१८

**शासन निर्णय-**

एकात्मिक बाल विकास सेवायोजना हया केंद्रपुरस्कृत योजनेतंर्गत अंगणवाडी सेविका,मदतनीस तसेच मुख्यसेविका/पर्यवेक्षिका यांना प्रशिक्षण देण्यासाठी सद्यस्थितीत ५ मध्यमस्तर प्रशिक्षण केंद्र व ३० अंगणवाडी प्रशिक्षण केंद्रे कार्यरत आहेत. या सर्व प्रशिक्षण केंद्रांना प्रशिक्षणाचे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी प्रशिक्षणाचा कार्यक्रम आयुक्त,ए.बा.वि.सेवायोजना,नवी मुंबई यांच्याकडुन तयार करुन देण्यात येतो. सदर प्रशिक्षण संस्थाना केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या निकषानुसार अनुदान देण्यात येते. केंद्र शासन व राज्य शासन यांचे निधीचे प्रमाण ६० : ४० असे आहे.

२. यापुर्वी प्रशिक्षण संस्थाचा निधी केंद्र लेखाशिर्ष २२३६१९७२ (३१ सहायक अनुदान) व राज्य लेखाशिर्ष (२२३६१९८१) (३१ सहायक अनुदान) यामधुन एकत्रित मंजूर केलेल्या निधीमधुन भागविण्यात येत होता. प्रशिक्षण संस्थाना मंजूर करण्यात येणारा निधी स्वतंत्रपणे APIP मध्ये दर्शविण्यात येत असल्यामुळे केंद्र हिस्सा ६०% व राज्य हिस्सा ४०% निधी अर्थसंकल्पित करण्यासाठी स्वतंत्र नविन लेखाशिर्ष घेण्यास तसेच केंद्र हिश्याचा निधी PFMS प्रणालीव्दारे अदा करण्यास बँकेत खाते उघडण्यास मान्यता देण्याबाबत नियोजन विभागामार्फत वित्त विभागास विनंती करण्यात आली होती.

३. केंद्र हिश्यासाठी ६०% (२२३६२००१) व राज्य हिश्यासाठी ४०% (२२३६२०१२) नविन लेखाशिर्ष मंजूर करुन घेण्यात आलेले आहे. सदर लेखाशिर्ष कार्यन्वीत करण्यासाठी हिवाळी अधिवेशनात लाक्षणिक पुरवणी मागणी प्रस्ताव सादर करण्यात आलेला होता. पुर्वीच्या लेखाशिर्षाखाली वितरीत केलेल्या तरतुदीमधुन आता नव्याने घेण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली तरतुदी पुर्नर्विनियोजन व्दारे उपलब्ध करुन घेण्यास आयुक्त, ए.बा.वि.सेवायोजना,नवी मुंबई यांना शासन मंजूरी देत आहे.

४. वित्त विभागाने प्रशिक्षण संस्थाचा निधी वितरीत करण्यासाठी स्टेट बँक ऑफ इंडियाच्या Special Product Code खाली रजिस्ट्रेशन करण्याबाबत व राष्ट्रीयकृत बँकेत खाते उघडण्याबाबत सूचित केले आहे. तसेच single Account with multiplc digital signatories with payment limits याबाबत निकटच्या भविष्यात अवलंब करणेची शिफारस करण्यात आलेली आहे. त्यानुसार कार्यवाही करण्याबाबत शासनाच्या

दिनांक १९ ऑक्टोबर २०१८ च्या पत्रान्वये आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई यांना कळविण्यात आलेले आहे.

५. सहाय्यक आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांनी संदर्भाधिन दिनांक १२ डिसेंबर २०१८ च्या पत्रान्वये सन २०१६-१७ व २०१७-१८ या कालावधीसाठी प्रशिक्षण संस्थाना निधी वितरीत करण्याबाबत प्रस्ताव सादर केलेला आहे. त्याचे अवलोकन केले असता सन २०१७-१८ या वर्षासाठी प्रशिक्षण संस्थानिहाय निधी वितरणाचा प्रस्ताव सादर केलेला **असल्यामुळे सन २०१७-१८ या वर्षासाठी खालीलप्रमाणे रुपये ६९६.५२ लाख निधी प्रशिक्षण संस्थानिहाय वितरीत करण्यास शासन मंजूरी देत आहे**. सन २०१६-१७ या वर्षासाठी संस्थानिहाय प्रस्ताव सादर केल्यानंतर निधी वितरीत करण्याबाबत यथावकाश निर्णय घेण्यात येईल.

| अ. क्र. | तपशील | मागणी करण्यात आलेली रक्कम | | | केंद्राने उपलब्ध करुन दिलेला निधी (अ.क्र.१ व २ साठी) |
|---|---|---|---|---|---|
| | | एकुण | केंद्र हिस्सा ६०% | राज्य हिस्सा ४०% | |
| १ | ५ मध्यमस्तर प्रशिक्षण केंद्र मागणी | रु.७४,५४,२४३.०० | रु.४४,७२,५४६.०० | रु.२९,८१,६९७.०० | रु.४,१७,९१,४००.०० |
| २ | ३० अंगणवाडी प्रशिक्षण केंद्र | रु.७,१६,१४,१६७.०० | रु.४,२९,६८,५००.०० | रु.२,८६,४५,६६७.०० | रु.२,७८,६०,९३४.०० |
| एकुण | | **रु.७,९०,६८,४१०.००** | **रु.४,७४,४१,०४६.००** | **रु.३,१६,२७,३६४.००** | **रु.६,९६,५२,३३४.००** |

हा शासन निर्णय वित्त विभाग,शासन परिपत्रक क्रमांक:- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल २०१८ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०७१५०४०१८५३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2019.01.07 15:13:39 +05'30'

(ला.रा.गुजर)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
४) सर्व,जिल्हा कोषागार अधिकारी

५) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे.

६) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.

७) सर्व महिला व बाल विकास अधिकारी (जिल्हा परिषद)

८) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण/नागरी/आदिवासी ) प्रकल्प

९) वित्त विभाग (व्यय/६ ,अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.

१०) (नियोजन विभाग/का.१४७२),मंत्रालय,मुंबई.

११) सह (श्री. गुजर) उप सचिव (श्रीमती निवतकर), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

त्यांना कळविण्यात येते की, त्यांनी BDS वर आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई यांना निधी वितरीत करावा.

१३) निवड नस्ती -का-६.